**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,**
**शासन आदेश क्रमांक: युडब्ल्युए-२०१३/प्र.क्र.१५१ /कामगार-५**
मादाम कामा मार्ग, हुतात्म राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक: २० नोव्हेंबर, २०१८

**संदर्भ : १) पोलीस उप आयुक्त (सायबर गुन्हे), अतिरिक्त कार्यभार, पोलीस उप आयुक्त (प्रकटीकरण-१), गुन्हे शाखा, गुन्हे अन्वेषण विभाग, मुंबई यांचे क्र.९२७/पोउआ/ प्र-१/कक्ष-११/१८, दिनांक ०४/०८/२०१८ चे पत्र.**
**२) शासन समक्रमांक पत्र दिनांक २०/१०/२०१८ .**
**३) कामगार आयुक्त (प्र.) यांचे पत्र क्र.काआ/ गोप/ माथाडी/ ११८८/२०१८, दिनांक १५/११/२०१८ .**

**प्रस्तावना :-**

सह्याद्रीनगर, कांदिवली येथील कापड बाजार आणि दुकाने मंडळाच्या नोंदित कामगारांसाठी असलेल्या सदनिकांच्या बेकायदेशिर हस्तांतरण प्रक्रियेत झालेल्या अनियमितते संदर्भात पोलीस उप आयुक्त (सायबर गुन्हे) अतिरिक्त कार्यभार पोलीस उप आयुक्त (प्रकटीकरण-१) गुन्हे शाखा, गुन्हे अन्वेषण विभाग, मुंबई यांनी शासनास अहवाल सादर केला आहे. या अनुषंगाने प्राप्त विनंतीनुसार फौजदारी तक्रार दाखल करण्याची कार्यवाही करण्याबाबत कामगार आयुक्त यांना संदर्भाधिन शासन पत्र दि.२०/१०/२०१८ रोजीच्या पत्रान्वये कळविण्यात आले होते. त्याचबरोबर चौकशीची ही कार्यवाही करताना कार्यवाही नि:पक्ष व्हावी याकरिता कापड बाजार आणि दुकाने मंडळातील सद्य:स्थितीमध्ये कार्यरत असलेले अध्यक्ष व सचिव वगळता सन २०१७ पूर्वीपासून कार्यरत असलेले मंडळाचे निरीक्षक, सुपरवायझर, कार्मिक अधिकारी, लिपिक व वर्ग-३ व ४ चे कर्मचारी यांच्यासह कंत्राटी पध्दतीने कार्यरत असलेल्या कर्मचा-यांची तात्काळ इतर मंडळामध्ये बदलीने नियुक्ती करावी असेही निर्देश कामगार आयुक्त यांना संदर्भाधिन शासन पत्रान्वये देण्यात आले होते. शासनाच्या निर्देशानुसार कामगार आयुक्त यांच्या पत्र क्र. काआ/ गोप/ माथाडी/ ११८८/२०१८, दि.१५/११/२०१८ अन्वये प्रस्ताव शासनस्तरावर उचित निर्णय घेणे व संबंधित मंडळांना महाराष्ट्र माथाडी हमाल व श्रमजीवी कामगार ( नोकरीचे नियमन व कल्याण) अधिनियम, १९६९ च्या कलम ७(४) नुसार आदेशित करण्याकरिता प्राप्त झाला आहे. हा प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन होता.

**शासन आदेश :-**

१. राज्य शासनाच्या विचाराधीन कापड बाजार आणि दुकाने मंडळासंदर्भातील प्रस्ताव तसेच इतर मंडळांचा प्रस्ताव विचारात घेवून कामगार आयुक्त , महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी संदर्भाधिन दिनांक १५/११/२०१८ रोजीच्या पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावास महाराष्ट्र माथाडी हमाल व श्रमजीवी कामगार ( नोकरीचे नियमन व कल्याण) अधिनियम, १९६९ च्या

कलम ७(४) अन्वये शासनस्तरावर मान्यता देण्यात येत असून खालील तक्त्यामध्ये दर्शविल्याप्रमाणे कापड बाजार आणि दुकाने मंडळ व मुंबई भाजीपाला बाजार असंरक्षित कामगार मंडळ यांनी त्यात नमूद कर्मचारी यांना तात्काळ कार्यमुक्त करुन त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या संबंधित माथाडी मंडळामध्ये रुजू होण्याचे निर्देश देण्यासंदर्भात कार्यवाही करण्याचे आदेश देण्यात येत आहेत. त्यानुसार संबंधित माथाडी मंडळांचे अध्यक्ष / सचिव यांनी तातडीने कार्यवाही करुन कामगार आयुक्त यांच्यामार्फत अनुपालन अहवाल शासनास त्वरीत सादर करावा.

| **क्र** | **कर्मचा-याचे नांव** | **पदनाम** | **सद्य:स्थितीत कार्यरत मंडळाचे नांव** | **समकक्ष पदावर स्थानांतराने पदस्थापना दयावयाचे मंडळाचे** | **कार्यभाराचे स्वरुप** |
|---|---|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) | (५) | (६) |
| १ | श्री.भाऊसाहेब गांगुर्डे | कार्मिक अधिकारी | कापड बाजार आणि दुकाने मंडळ | कापूस बाजार कामगार मंडळ, बृहन्मुंबई, ठाणे | पूर्ण वेळ |
| २ | श्री. अशोक भोसले | निरीक्षक | वरील प्रमाणे | दि क्लिअरींग अँड फॉरवर्डीग असंरक्षित गोदी कामगार मंडळ | पूर्ण वेळ |
| ३ | श्री.बाळकृष्ण जाधव | पर्यवेक्षक | वरील प्रमाणे | रेल्वे गुड्स क्लिअरींग ॲण्ड फॉरवर्डीग एस्टॅब्लिशमेंट लेबर बोर्ड, मुंबई | पूर्ण वेळ |
| ४ | श्री. सुरेश खोपडे | सहाय्यक लेखापाल | वरील प्रमाणे | माल वाहतूक कामगार मंडळ, बृहन्मुंबई | पूर्ण वेळ |
| ५ | श्री.संजय गायकवाड | रोखपाल/ वरिष्ठ लिपिक | वरील प्रमाणे | धातू व कागद बाजार मंडळ | पूर्ण वेळ |
| ६ | श्री. अमोल चव्हाण | शिपाई | वरील प्रमाणे | वरील प्रमाणे | पूर्ण वेळ |
| ७ | श्री. कैलास म. सगरे | निरीक्षक | मुंबई भाजीपाला बाजार कामगार असंरक्षित मंडळ | कापड बाजार आणि दुकाने मंडळ | पूर्ण वेळ |
| ८ | श्रीमती श्रवरी स.परब | लिपिक-टंकलेखक | वरील प्रमाणे | वरील प्रमाणे | पूर्ण वेळ |
| ९ | श्री.अनिल उ. नाणोस्कर | लिपिक-टंकलेखक | वरील प्रमाणे | वरील प्रमाणे | पूर्ण वेळ |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| १० | श्रीमती विनिता वि. देवरुखकर | लिपिक-टंकलेखक | वरील प्रमाणे | वरील प्रमाणे | पूर्ण वेळ |
| ११ | श्री. महेंद्र आ. साळवी | लिपिक-टंकलेखक | मुंबई भाजीपाला बाजार कामगार असंरक्षित मंडळ | वरील प्रमाणे | पूर्ण वेळ |
| १२ | श्री. सचिंद्र वि. पवार | शिपाई | वरील प्रमाणे | वरील प्रमाणे | पूर्ण वेळ |
| १३ | श्रीमती अनिसा अ. आगा | कार्मिक अधिकारी | वरील प्रमाणे | वरील प्रमाणे | पूर्ण वेळ |
| १४ | श्री. एस. जी. बेलोशे | सहाय्यक लेखापाल | माल वाहतूक कामगार मंडळ, बृहन्मुंबई | वरील प्रमाणे | अतिरिक्त कार्यभार |
| १५ | श्री.ए.पी. पाटील | पर्यवेक्षक | वरील प्रमाणे | वरील प्रमाणे | अतिरिक्त कार्यभार |

२. स्थानांतरणाने पदस्थापना केलेल्या कर्मचारी यांना संबंधित माथाडी मंडळाने कार्यमुक्त केल्यानंतर संबंधित कर्मचा-यांना नुतन ठिकाणी रुजू होण्याकरिता **पदग्रहन** कालावधी अनुज्ञेय रहाणार नाही.

३. मंडळाने वर दर्शविल्याप्रमाणे नव्याने पदस्थापना करण्यात आलेल्या कर्मचा-यास तत्काळ कार्यमुक्त/ रुजू न केल्यास मंडळाचे अध्यक्ष व सचिव यांचे विरुध्द नियमानुसार कार्यवाही करण्यात येईल यांची नोंद घ्यावी.

४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१८११२०१०५८५२७८१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Sanjay Vithoba Kalbhor

Digitally signed by Sanjay Vithoba Kalbhor
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industry Energy and Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f38e777689de3b7f0254b419127daa9612b470f287aa6310645bf8f39ddb6811, serialNumber=df8236826d559ff6f7f76f1d6d59c70c92e9c010f48017078d824be6d2b5b8d1, cn=Sanjay Vithoba Kalbhor
Date: 2018.11.20 13:14:43 +05'30'

**( संजय वि.काळभोर )**
**कार्यासन अधिकारी**

**प्रति,**

१) मा.मंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
२) मा.प्रधान सचिव (कामगार), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई,

३) कामगार आयुक्त, कामगार भवन, बांद्रा-कुर्ला कॉम्प्लेक्स, बांद्रा (पूर्व), मुंबई-५१,
४) विकास आयुक्त (असंघटीत कामगार), कामगार भवन, बांद्रा-कुर्ला कॉम्प्लेक्स, बांद्रा (पूर्व), मुंबई-५१,
५) अध्यक्ष, कापड बाजार आणि दुकाने मंडळ
६) अध्यक्ष, रेल्वे गुड्स क्लिअरींग ॲण्ड फॉरवर्डीग एस्टॅब्लिशमेंट लेबर बोर्ड, मुंबई
७) अध्यक्ष, माल वाहतूक कामगार मंडळ, बृहन्मुंबई
८)अध्यक्ष, कापूस बाजार कामगार मंडळ, बृहन्मुंबई, ठाणे
९) अध्यक्ष, दि क्लिअरींग अँड फॉरवर्डींग असंरक्षित गोदी कामगार मंडळ
१०) अध्यक्ष, धातू व कागद बाजार मंडळ
११) निवड नस्ती/काम.५.